उपग्रहाद्वारे संगणकीकृत तिकीट प्रणाली सेवा उपलब्ध करुन देण्याकरिता सेवा पुरवठादारांना शासन मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ईएनटी २०१३/प्र.क्र.११५/टी-१,

३२वा मजला, सेंटर १ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड,कुलाबा, मुंबई ४०० ००५
तारीख: १ सप्टेंबर, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः **ईएनटी२०१३/प्र.क्र.३३/टी-१ दिनांक २८ फेब्रुवारी, २०१३**
२) शासन निर्णय क्रमांकः **ईएनटी २०१३/प्र.क्र. ९१/टी-१ दिनांक ४ एप्रिल २०१३.**

**प्रस्तावना**

राज्यातील फिरती चित्रपटगृहे वगळून सर्व स्थायी व स्थायीवत चित्रपटगृहांमध्ये उपग्रहाद्वारे संगणकीकृत तिकीट प्रणालीचा वापर करणेकरिता रु. १ प्रति तिकीट एवढे अतिरिक्त सेवा शुल्क आकारण्यास राज्य शासनाने मान्यता दिलेली आहे. सदर सेवा पुरविणे तसेच अनुषांगिक संकलित माहिती प्रदान करणेकरिता शासनाने दि. २८ फेब्रुवारी २०१३ रोजी निर्गमित शासन निर्णयान्वये कार्यपध्दती निश्चित केली आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासन निर्णयामध्ये नमूद अटींची पुर्तता करण्याची तयारी दर्शविली असल्याने मे.इम्पॅक्ट मिडीया एक्सचेंज लि. या सेवा पुरवठादारास सदर सेवेकरिता प्रमाणित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

१. मे.इम्पॅक्ट मिडीया एक्सचेंज लि. या कंपनीस /सेवा पुरवठादारास शासनाने दि. २८ फेब्रुवारी २०१३ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयान्वये निश्चित कार्यपध्दतीचे काटेकोरपणे अवलंबन करण्याच्या अटींवर राज्यातील चित्रपटगृहास उपग्रहाद्वारे संगणकीकृत तिकीट प्रणाली उपलब्ध करुन देण्यास प्रमाणित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वी मे.इम्पॅक्ट मिडीया एक्सचेंज लि. या सेवापुरवठादाराने राज्यातील चित्रपटगृहांना उपग्रहाद्वारे संगणकीकृत तिकीट प्रणाली उपलब्ध

करुन दिली असली तरीही चित्रपटगृह चालक/मालकांना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अनुज्ञेय अतिरिक्त सेवाशुल्क आकारणी करता येईल. सदर सेवाशुल्क आकारणी पूर्वलक्षी प्रभावाने अनुज्ञेय होणार नाही.

३. मे.इम्पॅक्ट मिडीया एक्सचेंज लि. या सेवापुरवठादाराने शासनाने निश्चित केलेली रु. १ कोटी इतक्या रक्कमेची बँक गॅरेंटी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर ७ कार्यालयीन दिवसांमध्ये शासनाकडे जमा करणे आवश्यक आहे. या बँक गॅरेंटीचे प्रत्येक आर्थिक वर्षाच्या सुरुवातीला म्हणजेच दरवर्षी एप्रिल महिन्याच्या पहिल्या आठवडयात नुतनीकरण करणे आवश्यक आहे. नूतनीकरण न झाल्यास सदर सेवा पुरवठादारास दिलेली मान्यता रद्द करण्यात येईल

४. सेवा पुरवठादारास मान्यता देण्यामागे नियमावलीचे पालन बंधनकारक करुन चित्रपटगृह चालकास शासनाने मान्यता दिल्यानुसार प्रतितिकीट १ रु. सेवाशुल्क आकारणी लागू करणे व तिकीट विक्रीबाबत माहिती उपलब्ध होणे हा उद्देश आहे.

५. शासनाने मान्यता प्राप्त केलेल्या कोणत्या सेवा पुरवठादाराची सेवा घ्यावी याबाबत अंतिम निर्णय चित्रपटगृह चालकांचा असेल. **कोणत्याही एकाच कंपनीचा / सेवा पुरवठादाराच्या सेवा स्विकारण्याबाबत चित्रपटगृह चालकावर बंधन असणार नाही.**

६. सेवा पुरवठादाराच्या सेवा घेतांना चित्रपटगृह चालकाने सेवा पुरवठादाराशी आवश्यक अटी अंतर्भूत करुन योग्य वाटेल त्या शासन मान्यता प्राप्त सेवा पुरवठादाराबरोबर करार करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०११२३४०८१४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Ramppa Hampayya

Digitally signed by Vidya Ramppa Hampayya
DN: CN = Vidya Ramppa Hampayya, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.09.01 15:15:30 +05'30'

(विद्या हम्पय्या)
शासनाचे अवर सचिव

<u>प्रत, तातडीच्या आवश्यक कार्यवाहीकरिता</u>

१. सर्व विभागीय आयुक्त,

२. सर्व जिल्हाधिकारी,

३. मे. इम्पॅक्ट मिडीया एक्सचेंज लि. ६०२, सेंटर पॉईंट, जे.बी.नगर, अंधेरी-कुर्ला रोड, अंधेरी (पू), मुंबई ४०० ०५९.

<u>प्रत माहितीकरीता-</u>

१. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई-३२,

२. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, जागतिक व्यापार केंद्र, ३२ वा मजला, सेंट्रल १, कफ परेड, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

३. अपर मुख्य सचिव (महसूल), नविन प्रशासकीय भवन, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई ३२,

४. प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

५. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,

६. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,

७. निवड नस्ती, टी-१ कार्यासन.